**कोकणाच्या विकासासाठी रत्नागिरी येथे Maharashtra Ocean Applied Sciences University (MOASU) स्थापन करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४६/विशि-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई : ४०००३२.
तारीख : ४ नोव्हेंबर, २०२०.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्राला ७२० कि.मी. चा समुद्र किनारा लाभलेला आहे. ह्या किनाऱ्यास खाड्या, वाळूचे किनारे, कांदळवन, सागरी समुद्ध जैव यांची विविधता लाभलेली आहे. समुद्राचा उपयोग मासेमारी, वाहतूक आणि पर्यटनासाठी होतो. समुद्र किनाऱ्यावर वसलेल्या लाखो लोकांना रोजगार व्यवसायासाठी किनाऱ्याचा मोठा फायदा होतो. परंतु त्यासाठी लागणारे योग्य शास्त्रीय ज्ञान, शिक्षण स्थानिक युवकांना मिळत नाही. समुद्र शास्त्र विषयावर उच्च दर्जाचे शिक्षण आणि संशोधन करण्यासाठी भारतात एकही समुद्र शास्त्र विद्यापीठ नाही. तथापि, समुद्र जीव शास्त्र, समुद्र भूशास्त्र, मस्य शास्त्र, तंत्रज्ञान, पर्यटन, पर्यावरण शास्त्र आणि संवर्धन इत्यादी विषयांबाबतचे विद्यापीठ कोकणामध्ये स्थापन करण्यासंदर्भात निकष निश्चित करण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कोकणाच्या विकासासाठी रत्नागिरी येथे Maharashtra Ocean Applied Sciences University (MOASU) स्थापन करण्यासंदर्भात शासनास शिफारस करण्यासाठी खालील समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १ | डॉ.सारंग कुलकर्णी, मुख्य निदेशक आणि मुख्य व्यवस्थापक, एमटीडीसीचे इंडियन इन्स्टिट्युट ऑफ स्कूबा डायव्हिंग ॲण्ड ॲक्वाटिक स्पोर्टस्, तारकर्ली, ता.मालवण, जि. सिंधुदुर्ग | अध्यक्ष |
| २ | डॉ.नरसिंह ठाकूर, सीएसआयआर नॅशनल इन्स्टिट्युट ऑफ ओशियोनोग्राफ्री, डोना पावला, गोवा | सदस्य |
| ३ | डॉ.बी.बी. चौगुले, पुणे कॉलेज ऑफ फार्मसी, पुणे | सदस्य |
| ४ | संचालक, उच्च शिक्षण, पुणे | सदस्य सचिव |

**उपरोक्त समिती खालील बाबींचा सर्वंकष विचार करुन शासनास अहवाल सादर करेल:-**

- कोकणामध्ये समुद्र किनाऱ्याची लांबी व पायाभूत सुविधा विचारात घेऊन समुद्री विद्यापीठाची आवश्यकता.
- कोकणातील शिक्षणाचा दर्जा उंचावण्यासाठी समुद्री विद्यापीठ स्थापना करणे उचित ठरेल किंवा कसे, त्यादृष्टीने उपाययोजना करण्यासाठी बदल सुचविणे.
- कोकणासाठी समुद्री विद्यापीठ स्थापन करण्यासाठी किती जमीन आवश्यक आहे. (त्याबाबतचा तपशील)
- समुद्री विद्यापीठ स्थापन करण्यासाठी किती रुपये खर्च येईल.(आवर्ती व अनावर्ती)
- समुद्री विद्यापीठ स्थापनेमुळे कोकणातील विद्यार्थ्यांना रोजगाराभिमुख शिक्षण मिळण्यासाठी व त्याअनुषंगाने विद्यापीठात कोण कोणते अभ्यासक्रम शिकविण्यास प्राधान्य देण्यात यावे. तसेच विद्यापीठामध्ये विद्यार्थी क्षमता किती असावी.
- समुद्री विद्यापीठामध्ये जे विषय शिकविले जाणार आहेत त्या विद्यापीठातील शिक्षकांची पात्रता, निकष काय असावेत.
- विद्यापीठ स्थापन करण्यासाठी विद्यापीठ अनुदान आयोगाने वेळोवेळी विहित केलेले नियमांच्या आधारे विद्यापीठ स्थापन करणे योग्य राहील किंवा कसे.
- देशात अन्य राज्यात समुद्री विद्यापीठ स्थापन करण्यात आले आहे किंवा काय याबाबतची तपशीलवार माहिती.
- वरील मुद्दयांव्यतिरीक्त अन्य काही महत्वाचे मुद्दे आवश्यक वाटल्यास त्यांच्या आधारे शिफारशी करणे.

२. सदर समिती तीन महिन्यात शासनास अहवाल सादर करील.

३. समितीला आवश्यक ती सर्व प्रशासकीय मदत मुंबई विद्यापीठ, मुंबई यांनी उपलब्ध करुन द्यावी. तसेच समितीसाठी बैठक भत्त्यासह येणारा संपूर्ण खर्च विद्यापीठाने त्यांच्या निधीतून विद्यापीठाच्या नियमावलीप्रमाणे करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११०४१४५१०४३४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2020.11.04 14:53:37 +05'30'

**(अ.म.बाविस्कर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल कार्यालयाचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई :-४०००३२.

३) डॉ.सारंग कुलकर्णी, मुख्य निदेशक आणि मुख्य व्यवस्थापक, एमटीडीसी इंडियन इन्स्टिटट्युट ऑफ स्कुबा डायव्हिंग अ‍ॅण्ड अ‍ॅक्वाटिक स्पोर्टस, तारकर्ली, ता.मालवण, जि. सिंधुदुर्ग - ४१६६०६.

४) डॉ.नरसिंह ठाकूर, सीएसआयआर नॅशनल इन्स्टिटट्युट ऑफ ओशियोनोग्राफ्री, डोना पावला, गोवा.

५) डॉ.बी.बी. चौगुले, पुणे कॉलेज ऑफ फार्मसी, पुणे, बिल्डिंग नं.२, ब्लॉक नं.३, चैतन्य हौ. सो, सेनापती बापट रोड, पुणे-४११०१६.

६) कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई.

७) संचालक, उच्च शिक्षण, पुणे.

८) महालेखापाल, (लेखा व परिक्षा-१)/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

९) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

१०) अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

११) निवडनस्ती(विशि-४).